**डॉ.पंजाबराव देशमुख, विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेतील सहायक प्राध्यापक वर्ग-१ या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्र. प्रतिनि २०२३/प्र.क्र.९५/प्रशि-४ (१२-अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०१ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ -:**

१) शासन निर्णय, सा.प्र.वि.क्र. एसआरव्ही -२०११/प्र.क्र.१३७/कार्या-१२, दि.१७.१२.२०१६.
२) शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.५१०/कार्या-१२, दि.१६.०२.२०१८.
३) विभागीय आयुक्त, तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती डॉ.पंजाबराव देशमुख, विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती यांचे पत्र क्र.कक्ष/आस्था/कावि-३०४४/२०२३. दि.३१.०८.२०२३
४) महसूल व वन विभाग क्र. प्रतिनि-२०२३/प्र.क्र.१३६/ई-३, यांचे दि.२५.०६.२०२४ चे पत्र.

**शासन आदेश :-**

डॉ.पंजाबराव देशमुख, विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या राज्य प्रशिक्षण धोरणान्वये घोषित करण्यात आलेल्या विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थेत रिक्त असलेल्या सहायक प्राध्यापक वर्ग-१ (वेतनश्रेणी एस-१९-५५१००-१७५१००) या पदाकरीता प्रतिनियुक्ती धोरणाच्या प्रचलित कार्यपध्दतीनुसार श्रीमती निकेता कृष्णराव जावरकर, तहसिलदार (वेतनश्रेणी एस-१९-५५१००-१७५१००) यांची खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे. :-

| अ.क्र. | नाव /पदनाम/वेतनश्रेणी | मुळ प्रशासकीय विभाग | प्रतिनियुक्तीचे पद/ वेतनश्रेणी | प्रतिनियुक्तीचा दिनांक | प्रतिनियुक्तीचा कालावधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती निकेता कृष्णराव जावरकर तहसिलदार एस-१९-५५१००-१७५१०० | महसूल व वन विभाग | सहायक प्राध्यापक वर्ग-१ एस-१९-५५१००-१७५१०० | आदेशाच्या दिनांकापासून | ३ वर्षे |

२. महसूल व वन विभागाने श्रीमती निकेता कृष्णराव जावरकर, तहसिलदार यांच्या प्रतिनियुक्तीची नोंद घेवून आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. सदर प्रतिनियुक्ती महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा....) नियम १९८१ च्या परिशिष्ट-२ मधील खालील अटी व शर्तींच्या अधीन राहील:-

१) प्रस्तुत प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी संबंधित विभागास लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने सेवेची आवश्यकता वाटल्यास सदर अधिका-यास परत बोलविण्यात येईल.डॉ.पंजाबराव देशमुख, विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस वरील अधिकाऱ्यांच्या सेवेची आवश्यकता नसल्यास संबंधितांना ३ महिन्याची नोटीस द्यावी लागेल. त्याचप्रमाणे शासनास सदर बाब अवगत करण्यात यावी.

२) प्रतिनियुक्तीवर असतानाच्या कालावधीतील वेतनाचा/रजा वेतनाचा खर्च डॉ.पंजाबराव देशमुख, विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेने करावा.

३) महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा....) नियम १९८१ च्या परिशिष्ट-४ मध्ये विहित केलेल्या दरानुसार डॉ.पंजाबराव देशमुख, विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेकडून रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदान देण्यात यावे.

४) सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधीमधील वर्गणी चालू ठेवण्यात यावी.

५) संबंधित अधिका-यांविरुध्द विभागीय चौकशी करावयाची झाल्यास त्यांच्या सेवा मूळ विभागाकडे परत करण्यात याव्यात.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०८०११५३६३२९४०७ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANUSHRI ARVIND PARAB

Digitally signed by ANUSHRI ARVIND PARAB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=9cd457c3499803413f595e2a9672abfe873725fe8cea5f909d2e30a578cdb448, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=94114817BD726F28FA97FD6789383FFB6B7167B44B2A0A517BD03DE3D9C87038, cn=ANUSHRI ARVIND PARAB
Date: 2024.08.01 15:51:35 +05'30'

**( अनुश्री परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपूर
२) महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे
३) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
४) जिल्हाधिकारी कार्यालय, यवतमाळ
५) उपसचिव,(ई-३) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख, विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
७) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
८) सहायक लेखा अधिकारी,डॉ.पंजाबराव देशमुख, विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
९) श्रीमती निकेता कृष्णराव जावरकर, तहसिलदार

**प्रत माहितीसाठी अग्रेषित :-**

१) अपर मुख्य सचिव(सेवा) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
२) निवडनस्ती सा.प्र.वि./प्रशि-४ (१२-अ).